**जिल्हा परिषद, परभणी अंतर्गत वर्ग-४ कर्मचाऱ्यांसाठी टाईप - I प्रकारातील १२ निवासस्थानांच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१८/प्र.क्र.६९/बांधकाम-४**

मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,

फोर्ट, मुंबई- ४०० ००१

तारीख: २३ जानेवारी,२०१९

<u>वाचा:-</u>

1) **अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,परभणी यांचे पत्र जा.क्र. जिप/बांध/तांशा/१३०९/२०१८, दिनांक १७.०३.२०१८**

<u>प्रस्तावना:-</u>

१. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांनी वरील पत्रान्वये जिल्हा परिषद, परभणी अंतर्गत वर्ग-४ च्या कर्मचाऱ्यांसाठी निवासस्थान इमारत बांधकाम प्रस्ताव सादर केला आहे. वरील प्रस्तावात एकूण १२ निवासस्थाने सर्वे नं. २९२ मध्ये बांधण्याचे प्रस्तावित आहेत. त्यामुळे जिल्हा परिषद परभणी यांच्या मागणी व गरजेनुसार टाईप-I प्रकारातील १२ निवासस्थानांच्या बांधकामाचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. अति मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद परभणी यांनी जिल्हा परिषद, परभणी अंतर्गत निवासस्थान बांधकामाकरीता उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां. वि. नागपूर यांच्याकडील नमुना नकाशा टाईप-I, जॉब क्र. टी-डीएन/आरईएस-१८, डीआरजी-१ उपयोगात आणला आहे. यासाठी सन २०१७-१८ च्या दरसूचीवर आधारीत एकूण रु. २६५.१४ लक्ष किंमतीचे अंदाजपत्रक सादर केले आहे. सदरील अंदाजपत्रक उप अभियंता जि.प.(बांध), व कार्यकारी अभियंता (बांध) जिल्हा परिषद, परभणी यांनी साक्षांकीत केले आहे. प्रस्तावासोबत कामाचा नमुना नकाशा, अंदाजपत्रक, जागेचा ले-आऊट, जि.प. ठराव इ. कागदपत्रे सादर केली आहेत.

३. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., परभणी यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती, जिल्हा परिषद, परभणी अंतर्गत वर्ग-४ च्या कर्मचाऱ्यांसाठी टाईप-I प्रकारातील १२ निवासस्थानांच्या बांधकामाच्या एकूण रु.२,६५,१४,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

४. जिल्हा परिषद, परभणी अंतर्गत येथील वर्ग-४ च्या कर्मचाऱ्यांसाठी टाईप-I प्रकारातील १२ निवासस्थानांच्या एकूण रु.२,६५,१४,०००/-( अक्षरी रुपये दोन कोटी पासष्ठ लक्ष चौदा हजार फक्त ) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटीं-शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) जिल्हा परिषद, परभणी अंतर्गत वर्ग-४ च्या कर्मचाऱ्यांसाठी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप-I प्रकारातील १२ निवासस्थानांच्या इमारतींचे बांधकाम ज्या जागेवर करावयाचे ती जागा प्रथमत: जिल्हा परिषद/ पंचायत समितीच्या स्वत:च्या नावावर करुन घेणे बंधनकारक राहील.

२) नियोजित निवासस्थान इमारतीचे बांधकाम जुनी इमारत पाडून करावयाचे असल्यास बांधकाम सुरु करण्यापुर्वी संबंधित अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, प्रादेशिक विभाग यांच्याकडून प्रथमत: अस्तित्वातील जुन्या इमारतीचे स्ट्रक्चरल ऑडीट करुन घेण्यात यावे, त्यानुसार अस्तित्वातील इमारत वापरण्यास अयोग्य असावी.

३) जिल्हा परिषद, परभणी अंतर्गत वर्ग-४ च्या कर्मचाऱ्यांसाठी टाईप-I प्रकारातील १२ निवासस्थान इमारत बांधकामाकरीता प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यास बांधकाम सुरु करण्यापुर्वी प्रथमत: मुख्य वास्तुशास्त्रज्ञ/प्रादेशिक उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांची मान्यता घेणे तसेच, अग्निशामन यंत्रणेची मंजूरी घेणे बंधनकारक राहील.

४) विहीत नमुना आराखड्यानुसार कामे हाती घेताना, स्थानिक नगररचना प्राधिकरणाची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.

५) या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास प्रथमत: सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेणे बंधनकारक राहील.

६) प्रस्तुत निवासी इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:भर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

७) प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

९) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी. या कामावर प्रशासकीय मान्यते पेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती / जिल्हा परिषदेने सोसावा.

५. प्रस्तुत निवासी इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे:-

| GENERAL ABSTRACT FOR TYPE- I , 12 QUARTER AT ZP PARBHANI | | |
|---|---|---|
| Sr. No. | Description of item | Amount (in Rs) |
| 1 | **COST OF Type I-12 Quarters** | 14795218.00 |
| 2 | **COST OF Septic Tank** | 145199.00 |
| | **Total A** | **14940417.00** |
| 3 | **Add for Electrification** | |
| | Internal 5% | 739761.00 |
| | External Street Light etc | 1000000.00 |
| | MSEB Charges | 100000.00 |
| 4 | Add for water supply & sanitation 5% | 1020476.00 |
| 5 | Compound wall and gate | 500000.00 |
| 6 | Internal Road | 1000000.00 |
| 7 | Parking Arrangements 4% | 300000.00 |
| 8 | Soil Investigation 0.05% | 73976.00 |
| 9 | Land Development | 300000.00 |
| | **Total B** | **5034213.00** |
| 10 | Add 4 % contingencies | 798985.00 |
| 11 | Add 12 % for GST | 2492834.00 |
| 12 | Water Main Storage and Pump House, Bore well - Pump House and Sump Well | **750000.00** |
| 13 | Rain Water Harvesting | 500000.00 |
| 14 | Price Escalation 10 % | 1997463.00 |
| | **Total C** | 6539282.00 |
| | **Grand Total A+B+C** | **26513912.00** |
| | **Says Rs.** | **26514000.00** |

६. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

७. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. या कामावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०५) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने- (२५१५१२५६)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

८. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०१९०१२३१४२९३६२८२०** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2019.01.23 17:36:09 +05'30'

( दि.बा.पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद
२) विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
३) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद परभणी
५) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद परभणी
६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद परभणी
७) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, परभणी
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परभणी
९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
१०) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
१०) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, परभणी
११) सभापती, पंचायत समिती, परभणी, जिल्हा परभणी
१२) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, परभणी, जिल्हा परभणी
१३) निवड नस्ती, कार्यासन क्र.पं.रा.७, ग्राम विकास विभाग,बांधकाम भवन मुंबई